**राज्यातील शेतक-यांना रासायनिक खताचा साठा व पुरवठा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्यादित, मुंबई यांना राष्ट्रीयकृत बँकेकडून घ्यावयाच्या रु.१३५ कोटी रकमेच्या कर्जास शासन हमी मंजूर करण्याबाबत.**

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
शासन निर्णय क्रमांक : शाहमी-२०११/सपवव/प्र.क्र.४७/अर्थबळ,
दिनांक :- २० मे, २०११

**वाचा** -१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१०९९/प्रक्र.६८/शा.हमी, दि. ५.११.१९९९.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.शाहमी -१००८/प्रक्र.१८/शा.हमी,दि.२८.४.२००८
३) महाव्यवस्थापक (खत) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई यांचे जा.क्र.खत/खरीप हंगाम/२०११-१२/१९, दि.१३.४.२०११ चे पत्र.

**प्रस्तावना:**

खरीप हंगाम २०११ साठी राज्यातील मागणीच्या तुलनेत खताच्या पुरवठयातील तूट भरुन काढण्यासाठी केंद्र शासनाच्या निदेशानुसार केंद्र शासनाने नियुक्त केलेल्या मे.ईंडियन पोटॅश लिमिटेड, झुवारी व आरसीएफ या खत कंपन्याकडून **युरिया/डीएपी/संयुक्त खताची** आयात करुन रासायनिक खताचा संरक्षित साठा करुन राज्यातील शेतक-यांना वेळेवर पुरवठा करण्यासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई या संस्थेची 'नोडल एजन्सी' म्हणून नियुक्ती करण्याचा शासनाने निर्णय घेतला आहे. याप्रमाणे **युरिया ०.३७५ लक्ष मे.टन, डीएपी ०.५६३ लक्ष मे.टन, संयुक्त खत ०.५६२ लक्ष मे.टन** असे एकूण १.५ लाख मे.टन खत आयात करुन, संरक्षित साठा करण्याकरिता मंत्रीमंडळ उपसमितीच्या शिफारसीच्या अनुषंगाने शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई यांना **रु.१३५ कोटी (रुपये एकशे पस्तीस कोटी फक्त)** चे कर्ज शासन हमीवर राष्ट्रीयकृत बँकेकडून घेण्यासाठी व सदर कर्जास दिनांक ३१.१२.२०११ पर्यंत शासन हमी मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

राज्यातील शेतक-यांना वेळेवर रासायनिक खतांचा पुरवठा करण्यासाठी **युरिया ०.३७५ लक्ष मे.टन, डीएपी ०.५६३ लक्ष मे.टन, संयुक्त खत ०.५६२ लक्ष मे.टन** असे एकूण १.५ लाख मे.टन खत पुरवठादार कंपन्याकडे मागणी करण्याकरिता सध्याच्या आंतरराष्ट्रीय दराप्रमाणे रु.१३५ कोटी इतकी रक्कम पुरवठा करणाऱ्या खत कंपन्यांना मागणी आदेशासह महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई यांनी अदा करण्यांची आवश्यकता आहे. सबब,महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई (ऋणको) यांना रु.१३५ कोटी इतके कर्ज राष्ट्रीयकृत बँकेकडून शासन हमीवर

घेण्यास मंजूरी देण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. त्यानुसार महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई यांना निविदा प्रक्रियेनुसार कमीतकमी व्याजदर असलेल्या राष्ट्रीयकृत बँकेकडून (धनको) सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या मान्यतेने **रु.१३५ कोटी (अक्षरी रुपये एकशे पस्तीस कोटी फक्त)** इतके कर्ज घेण्यासाठी शासन हमी मंजूर करण्यात येत आहे.

२. सदर शासन हमी वरील कर्ज रुपये १३५ कोटीपर्यंत आवश्यकतेनुसार उचलण्याची मुदत दिनांक ३१ डिसेंबर,२०११ पर्यंत वैध राहील.

३. धनको बँकेसमवेत शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तीचा समावेश करण्यात यावा. करारनाम्याशिवाय किंवा करारनामा स्वाक्षरीत होण्यापूर्वी बँकेने कर्ज संवितरीत केल्यास शासन हमी अवैध ठरेल.

अ) धनको बँकेकडून घेण्यात येणाऱ्या कर्जाचा वापर फक्त केंद्र शासनाच्या निदेशानुसार व शासनाने /मंत्रीमंडळ उपसमितीने मान्यता दिल्याप्रमाणे युरिया/डीएपी/संयुक्त खताची आयात करुन, त्याच्या संरक्षित साठयाकरिताच करण्यात यावा.

ब) कर्ज देणा-या धनको बँकेमध्ये महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई या संस्थेच्या नावे एक स्वतंत्र खाते (Escrow A/c) उघडण्यात यावे. उपरोक्त खात्यातून शासन हमीवर घेतलेले रु.१३५ कोटी व त्यावरील व्याजापोटी बँकेला देय असलेली रक्कम खत विक्रीतून जमा झालेल्या रक्कमेतून बँकेने परस्पर तात्काळ कापून घ्यावी. तद्नंतर फक्त कर्जाच्या शिल्लक रकमेवर व्याजाची आकारणी बँकेने करावी.

क) ऋणकोने प्रचलित दराने युरिया/डीएपी/संयुक्त खताच्या पुरवठ्याची आगावू मागणी (Advance booking) नोंदविणाऱ्याकडून प्रथम खताच्या विक्री किंमतीच्या कमीत कमी **२५% नोंदणी** रक्कम वसुल करावी. अशा मागणीमुळे प्राप्त होणारी रक्कम सदर महामंडळाने उपरोक्त खात्यात जमा करावी. आयातीत युरिया/डीएपी/संयुक्त खताच्या उपलब्धते संबंधीची माहिती महासंघाने मागणी नोंदविणाऱ्यांना द्यावी. तसेच खताच्या आयातीत युरिया/डीएपी/संयुक्त खताचा पुरवठा करता आला नाही तर योग्य त्या व्याजासह नोंदणीची रक्कम परत करण्यात येईल असेही त्यांना स्पष्ट करण्यात यावे.

ड) आयातीत युरिया/डीएपी/संयुक्त खताची विक्री तत्परतेने करण्यात यावी व विक्रीपोटी प्राप्त होणारी रक्कम उपरोक्त स्वतंत्र खात्यात तत्परतेने जमा करण्यात यावी. आयातीत युरिया/डीएपी/संयुक्त खत राज्यात ज्या ठिकाणी प्राप्त होईल त्याच ठिकाणी त्याची विक्री करण्यात यावी. इतर ठिकाणी, देशांतर्गत उपलब्ध असलेल्या युरिया/डीएपी/संयुक्त खताची विक्री करण्यात यावी.

इ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाने शासनाच्या निदेशाप्रमाणे खताच्या साठयाचा जास्तीत जास्त खप व्हावा यासाठी प्रयत्न करावेत.

ई) खताचा साठा संरक्षित ठेवण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाची राहील. संबंधित कर्ज देणा-या धनको बँकेने त्याबाबत वेळोवेळी खात्री करावी.

प) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई यांचेकडून शासनास देय असलेल्या हमीशुल्काचा शासनास भरणा केल्याशिवाय संबंधित बँकेने कर्ज मंजूर / वितरित करु नये.

फ) धनको बँक ही राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबईला या आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाही. तसेच सदर प्रयोजनासाठी ऋणको महासंघ इतर कोणत्याही वित्तीय संस्थेकडून कर्ज घेणार नाही. तसेच सदर शासन हमीचा वापर धनको बँक /ऋणको संस्थेस चक्रीय पध्दतीने करता येणार नाही.

भ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबईकडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची रक्कम देण्याबाबत होणाऱ्या कसुरीची ९० दिवसांच्या आत शासनास सूचना देणे धनको बँकेवर बंधनकारक असेल.

म) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई या महासंघाकडील कर्ज वसूलीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय धनको बँकेला हमी पूर्ततेकरीता शासन हमीची प्रतिभूती म्हणून वापर करता येणार नाही. धनको बँकेकडून शासन मान्यतेने महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाच्या चल/अचल मालमत्तेची विक्री / लिलाव (Auction) करुन, वसुलीचा निर्णय झाल्यास, **त्यासाठी** एक समिती स्थापन करावी व त्या समितीमध्ये सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग व वित्त विभाग यांचा प्रत्येकी एक प्रतिनिधी घेण्यात यावा. चल/अचल मालमत्तेची विक्री/लिलाव (Auction) करताना मुल्यांकन त्रयस्थ संस्थेकडून शासन नियमानुसार व शासनाच्या मान्यतेने करणे आवश्यक राहील. तसेच उक्त समितीमधील शासनाच्या उपस्थित दोन्ही प्रतिनिधींच्या अहवालासह लिलाव प्रक्रियेचे अंतिमीकरणास शासनाची मान्यता घेणे आवश्यक राहील. या हमी अनुषंगाने न्यायालयीन किंवा अन्य कोणतीही बाब उपस्थित झाल्यास संबंधित प्रशासकीय विभागाने त्याबाबतची पुढील कार्यवाही करणे आवश्यक राहील.

य) सदर हमी फक्त कर्जासाठीच देण्यात येत आहे. धनको बँकेच्या कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास त्याकरिता आकारण्यात आलेल्या व्याज, दंडनीय व्याजाकरीता व इतर कोणत्याही देय रकमांसाठी शासन हमी लागू होणार नाही.

र) धनको बँक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई यांच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल सोबत जोडलेल्या **<u>प्रपत्र-अे</u>** मध्ये शासनास दर सहा महिन्यानी (दि.३१ मार्च /३० सप्टेंबर) सादर करील.

ल) नियत दिनांकास हमीशुल्क वसुल करण्याची व शासन हमीवरील घेतलेल्या कर्जाच्या परतफेडीबाबत संनियंत्रणाची जबाबदारी सहसचिव/ उपसचिव, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांची राहील.

वरील (अ) ते (ल) पैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

४. महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई साठी रु. १३५ कोटीची हमी **वरील अटी तसेच** वरील वाचा अ.क्र.१ व २ येथील शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या खालील अटीं व शर्तींच्या अधीन राहील:-

अ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई हे Principal Debtor राहतील.

ब) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबईने धनको बँकेकडून उपलब्ध होणाऱ्या कर्जाबाबत आढावा घेऊन त्यासंबंधीच्या वित्तीय मर्यादा शासनाकडून निश्चित करुन घ्याव्यात.

क) धनको बँकेकडून घेतलेल्या कर्जाचा वापर महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई यांना शासन निर्णयात नमूद केलेल्या प्रयोजनाव्यतिरिक्त इतर कोणत्याही प्रयोजनाकरिता करता येणार नाही.

ड) आयातीत युरिया /डिएपी/संयुक्त खताची विक्री महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाने रोखीने करावी.

ई) धनको बँकने महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाला मंजूर केलेल्या कर्जाच्या आदेशामध्ये नमूद केलेल्या परतफेडीच्या वेळापत्रकानुसार कर्ज फेडीच्या शेवटच्या हप्त्याच्या दिनांकास हमी संपुष्टात येईल. सदर वेळापत्रकात नमूद केलेल्या विहित कालावधीसाठीच शासन हमी लागू राहील. या कालावधीनंतर संबंधीत धनको बँकेला शासन हमी आवाहनीत करता येणार नाही.

फ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाने दर महिन्याला कर्ज परतफेडीच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहीती सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग / वित्त विभागाकडे सादर करावी.

ग) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाने विहीत कार्यपध्दतीने लेखा परिक्षीत केलेल्या व संस्थेने मान्य केलेल्या संस्थेच्या लेख्याची एक प्रत शासनास सादर करावी.

५. **हमी शुल्क**

अ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाला सदर कर्जासाठी प्र.शे.प्र.व.हमीशुल्काचा दर रु.२/ - असा राहील. हे हमीशुल्क ज्या कालावधीकरीता देय राहील त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर (Total maximum outstanding amount) देय राहील. Escrow Account मधून महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई कडून हमीशूल्काचा भरणा प्रथमतः करण्यात यावा.

ब) हमी शुल्काचा भरणा दर सहा महिन्यानी करण्यास महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई हे जबाबदार असतील. प्रत्येक वित्तीय वर्षाच्या ३१ मार्च आणि/ अथवा ३० सप्टेंबर रोजी अदत्त असलेल्या घटना सापेक्ष दायित्वावर (Contingent Liability) देय असलेल्या हमी शुल्काचा भरणा अनुक्रमे १ एप्रिल आणि/ अथवा १ ऑक्टोबर रोजी करण्यात यावा.

क) हमी शुल्काचा भरणा केल्यानंतर त्यामधून प्रथम थकीत हमी शुल्कावरील दंडनीय व्याजाची रक्कम वळती करुन घेण्यात येईल. नंतर सर्वात जुन्या थकीत हमी शुल्काची वसुली, त्यानंतर त्यापेक्षा कमी जुन्या हमी शुल्काची वसुली याप्रमाणे रक्कम वळती करुन घेण्यात येईल.

ड) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबईकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या तीन

महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

इ) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाने शासन हमी शुल्काची रक्कम "००७५-संकीर्ण, सर्वसाधारण सेवा-१०८-हमी शुल्क" या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी. महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई यांनी महामडंळाकडून देय असलेली हमी शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात नियमितपणे भरणा केली जाते याची खात्री करुन घ्यावी.

ई) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ चलनाची साक्षांकित प्रत सहकार पणन व वस्त्रोद्योग विभागाने वित्त विभागास साक्षेपाने पाठवावी.

प) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ यांनी देय हमीशुल्काचा भरणा केला नाही तर सदर हमीशुल्क धनको बँक शासनाकडे भरणा करेल व महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघाकडून वसूल करेल, अन्यथा शासन हमी अवैध ठरेल.

६. हा शासन निर्णय सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागाच्या नस्ती क्र. *सपस-१०११/प्र.क्र.६९/२४-स वरील प्रस्ताव व वित्त विभागाचा शासन हमी क्र.४/२०११-२०१२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई समवेत कर्ज घेण्यासंबंधी करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरिता सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभागातील संबंधीत सहसचिव/उपसचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(मीनल पेडणेकर)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) राज्यपालाचे सचिव,
२) मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
३) उपमुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
४) सर्व विधानमंडळ सदस्य, विधानमंडळ,मुंबई,
५) सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
६) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
७) महालेखापाल, महाराष्ट्र १ / २ (लेखा परीक्षा),महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
८) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानभवन सचिवालय,मुंबई (५ प्रती)
९) बहुजन समाज पार्टी, डी-१, इन्सा इटमेंट, आझाद मैदान, मुंबई

१०) भारतीय जनता पार्टी, महाराष्ट्र प्रदेश,सी.डी.ओ.बॅरेक्स क्र १, योगक्षेमसमोर, वसंतराव भागवत चौक, नरीमन पॉईंट,मुंबई- ४०००२०,

११) भारतीय कम्युनिस्ट पार्टी, महाराष्ट्र कमिटी ३१४, राजभवन, एस.व्ही.पटेल रोड, मुंबई- ४,

१२) भारतीय कम्युनिस्ट पार्टी(मार्क्सवादी ) महाराष्ट्र कमिटी, जनशक्ती हॉल,ग्लोब मिल पॅलेस, वरळी, मुंबई-४०० ०१३,

१३) इंडियन नॅशनल काँग्रेस पार्टी, महाराष्ट्र प्रदेश काँग्रेस (आय) समिती, टिळक भवन, काकासाहेब गाडगीळ मार्ग, दादर, मुंबई- ४०००२५,

१४) नॅशनॅलिस्ट काँग्रेस पार्टी, राष्ट्रवादी भवन, फ्री प्रेस जर्नल मार्ग, नरीमन पॉईंट, मुंबई- २१,

१५) शिवसेना, शिवसेना भवन, गडकरी चौक, दादर, मुंबई-४०००२८,

१६) प्रधान सचिव, सहकार पणन व वस्त्रोद्योग/ कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२,

१७) महाव्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या.,मुंबई,कनमूर हाऊस, नरसी नाथा स्ट्रीट, पो.बॉ.नं.५०८०, मस्जीद बंदर, मुंबई-४०० ००९.

१८) वित्त विभाग (साउ / व्यय-२/ऋण व हमी नियंत्रण कक्ष ) मंत्रालय, मुंबई.

१९) अवर सचिव,२४ स, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई -३२,

२०) कार्यासन अधिकारी,२४ स, सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,मंत्रालय,मुंबई -३२,,

२१) राष्ट्रीयकृत बँक, (महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ, मुंबई मार्फत )

२२) निवड नस्ती -अर्थबळ